एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत राज्यातील अंगणवाडी कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्ती / राजीनामा / मृत्यू / सेवेतून काढून टाकणे यासंदर्भातील दिनांक ०१.०४.२०२२ नंतरच्या प्रकरणांना शासनामार्फ़त एकरकमी लाभ देण्याकरिता निधी वितरण.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- एबावि-२०२४/प्र.क्र.४३/का.०६**
नवीन प्रशासन भवन, ३रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ५ जून,२०२४

**संदर्भ:-** १) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१०/प्र.क्र.१४१/का.०६, दिनांक ३०.०४.२०१४
२) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०२१/प्र.क्र.१०२/का.०६, दिनांक २६.०२.२०२४

**शासन निर्णय:-**

संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका या अंगणवाडी कर्मचा-यांच्या दिनांक ०१.०४.२०२२ पासून ते ग्रॅज्युईटी लागू होईपर्यंतच्या कालावधीतील सेवानिवृत्ती / मृत्यू/ राजीनामा/ सेवेतून काढून टाकणे इ. प्रकरणी एकरकमी लाभ शासनामार्फ़त एकात्मिक बाल विकास सेवा योजना आयुक्तालयाकडून संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक ३०.०४.२०१४ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या सुत्रानुसार आणि पूर्णपणे शासनामार्फ़त देण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता खालील विवरणपत्रातील रकाना क्रमांक-१ मधील प्रधान लेखाशीर्ष/उपशीर्ष/उद्दिष्टामध्ये रकाना क्रमांक-२ मध्ये नमूद अर्थसंकल्पित तरतुदीमधून रकाना क्रमांक-३ मध्ये दर्शविल्यानुसार एकुण रुपये १०.०० कोटी एवढा निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये कोटीत)

| लेखाशीर्ष / उद्दिष्ट | अर्थसंकल्पिय तरतूद २०२४-२५ | या आदेशान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| मागणी क्रमांक एक्स-१,<br>२२३६-पोषण आहार,<br>०२ पोषक अन्न व पेय वितरण, १०१- विशेष पोषण आहार कार्यक्रम,<br>(०८) एकात्मिक बाल विकास सेवा योजना प्रकल्प,<br>(०८) (०७) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (एलआयसी हप्ता) (अतिरीक्त राज्य हिस्सा १००%) (कार्यक्रम), २२३६ १९६३,<br>३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) | ३०.०० | १०.०० |

२. अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांच्या दिनांक ०१.०४.२०२२ नंतरच्या एकरकमी लाभाच्या प्रकरणांची कार्यवाही आपल्यामार्फ़त करावयाची असल्याने त्यानुसार एकरकमी लाभाच्या प्रस्तावांची परिगणना करून त्याप्रमाणे संबंधित अंगणवाडी कर्मचा-यास लाभ अदा करण्याची कार्यवाही आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी तात्काळ करावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक क्रमांक १३८/ व्यय-६, दिनांक २१.०५.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६०५१२४५५१९४३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2024.06.14 16:59:30 +05'30'

**(वि.रा.ठाकूर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. मंत्री, महिला व बाल विकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ / २ , मुंबई /नागपूर.
७. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
८. सर्व विभागीय उपायुक्त (महिला व बाल विकास)
९. सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास), जिल्हा परिषद.
१०. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी, (ग्रामीण / आदिवासी / नागरी).
११. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१२. संबधित जिल्हा कोषागार अधिकारी
१३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१४. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती (का.६)